नोव्हेंबर १९७७

महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समितीच्या वतीने
महाराष्ट्र शासनाच्या शिक्षण विभागातर्फे प्रकाशित

किंमत : दोन रुपये

**मुद्रण**

शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय
मुंबई

# पृथ्वीखंड सावळा

मराठीच्या बाळपणापासून तुझ्या भक्तीनं भारलेल्या अशा असंख्य मराठी मन
देवा, मी तुझ्याबद्दल आजवर खूप खूप ऐकलं होतं. पण परवा परवा मी तुझ्या नग
आणि तुझं दर्शन घेतलं तशी मीही भारावून गेले.

ामुळं तुझ्याकडे एकटक बघताना मी तुझ्या चरणाखालच्या विटेला विचारलं की,
ती भाग्याची म्हणावीस कुंभाराच्या विटे! माझ्या विठू दयाळाचे पाय तुला ग
ले?

ण तेवढ्यात काय गंमत झाली की, तुझ्या भांगतुऱ्याला लक्ष मोती गुंफीत असलेली रख
आली. त्या कारणानं विटेचं उत्तर तिथंच रेंगाळलं न् मी रखुमाईच्या दर्शनानं
तिच्या अंगावरचे रत्नजडित अलंकार, हिरकणीची चोळी, पायघोळ जरीपातळ, नाक
ची नथ, इंद्रसभेच्या सोनारांनी घडण केलेला तिचा सौभाग्य चुडा, आणिक काय
बघून मी भांबावूनच गेले. इतक्यात तुझ्या हाती जाईचा झुंबडा देऊन तिनं तुझं प
खा, उपरणं हे सारं अंगावरून उतरलं न् हाती टाळवीणा दिला. म्हणाली की, "हरिना
ोळ झालाय तर तुम्ही पुढं व्हावं. वाखुऱ्या वड्यावरी दिंड्यापताकांचे जरीरुमाल
ताहेत तर आपण कथेसाठी वेळेला हजर रहावं." आणि देवा, तिचं ऐकून तू निघा
ा खेळायची ईर्षा मनी बाळगलीस. त्यासरशी मी तुम्हा दोघांच्यावरून माझी
ाळीत लिंबलोण केलं! गरुडखांबाला टेकून बसले आणि म्हटलं, बघत रहावं काय
ल ते.

आणि देवा, हे काय तुझं कीर्तनाला जाणं झालं का? उभ्या राउळात तुझ्या नावाचा
ाटा झालेला न् तुझा पत्ताही कळू नये! शोधायचं तरी किती माणसानं? विसाव्या
ात घालीत आलेल्या लोकांनी घाटाच्या पायऱ्या चढीत तुझ्या भेटीची अपेक्षा केल
लं की, तू जनीच्या मंदिरात उभा होतास म्हणून! चांगलं आहे.

इतक्यात झणत्कार झाला. उभं राऊळ इकडे तिकडे बघू लागलं. असं आलं तरी
ण सांगायचं म्हणजे ज्ञानदेव आले म्हणून तू स्वतः अवचितच तिथं उभा! जसा काय
लखत्या चांदणीला तुझं हिऱ्यासारखं रूप बघून भ्रम पडावा असं मला तरी वाटलं

ट काढतेली ! त्यासरशी मग सगळ्याच जनलोकांनी आपल्या देहाचा देहपाट करून अ
ीच्या वाती लावून तुला आपल्या पंचप्राणांची आरती केली आणि अंगठीवरील खडचाप्र
लेली पंढरी नगरी वाजंत्रीतुऱ्यांनी दणाणून गेली ! साधुसंतांचा घनदाट मेळा बसला.
इतक्यात कुणी तरी तुझी लेकबाळ महाद्वाराशी आली. तिनं नामदेवाच्या पायरीला नमस
नला. त्यासरशी देवा, रुक्मिणीआईसकट तू तिला सामोरं गेलास ! आम्ही ऐकलेलं
नराजाला आपण सामोरं गेला होता. चोखामेळ्याला जाऊन भेटला होतात. पण हा चमत
ना आम्ही आमच्या डोळ्यांनी पाहिला ! तुमचं सावळं रूप पृथ्वीखंडाचं कसं त्याचा अ
ाभर उलगडा झाला ! ! खरंच, देवा, आषाढी कार्तिकीचा महिमा दाटल्यावर तू गरुड
न भक्तांच्या वाटेकडे कसा डोळे लावून बसत असशील त्याची जराशी तरी कल्पना आम्ह
ना येऊ शकली ! म्हणताना आपल्या हिरव्या मंदिलावरील ताज्या तुऱ्यावर मी मनो
ाता टाकल्या. आणि मग तुळशीमंजिरींची माळ गुंफीत तिथंच घटकाभर टेकले.

पण तेवढ्यात एका बाईनं तुला दोन्ही नेत्र उघडून आपल्या काळजाचा ठाव घेत अ
मोकळं करायला तू विश्वासाचा धनी हो म्हटलं. त्यासरशी देवा, आपलं सोन्याचं ज
ारीत तुझ्या शेजारी तिला तू गुजाला बसवून घेतलीस. त्या कारणानं तिनं आपल्या गुज
ासानं झाडा केला. संगं आणलेली खिचडी तुला निवदाला दाखवली. त्या वेळी अवचि
ळात पाचशे मृदंग न् नऊशे टाळ वाजले ! त्यासरशी तू आपल्या रुंद भिवयांच्या
री गंध लावलास. आणि टाळांच्या टोपणासारखे आपले देखणे डोळे उघडलेस. म्हणत
डो हातांनी तुझ्या गळ्यात तुळशीमाळा घातल्या. हातात जाईजुईचे गजरे बांधले. ज
ी. नामदेव आले. साधुसंतांचा घनदाट मेळा जमला. आणि ज्ञानराजाला अभंग बोला
ून तू स्वतः कीर्तनाला उभा राहिलास ! चंद्रभागेच्या तासात त्यासरशी एकच टाळी झ
ण उभी पंढरी हरिनामाच्या गजरानं पावन झाली देवा ! त्या वेळी काय वाटलं कसं सां
ा ? यदुनंदना, द्वारकाधीशा, केशीराजा, विठूदेवा, तुझ्या दर्शनानं मी धन्य झाले, अ
ा चरणी साता पड्यांत जिवापाड सांभाळून आणलेल्या भावभावनांच्या गोण्यांचे
उपसले !

*

# १

## संग्राहिका : डॉ. सरोजिनी बाबर

विठ्ठल विठ्ठल छंद लागला जिवाला
एकदा जायाचं पांडुरंगाच्या गावाला

विठ्ठल विठ्ठल कंदी मजला भेटल
माज्या ग मनायाचा कंदी संशोव[1] फिटल

किती ग पुण्य केलं तू तर कुंभाराच्या विटं
विठू दयाळाची माज्या चरणं सापडली कुठं

विठ्ठल विठ्ठल हाका मारीते राऊळात
हातात टाळवीना उभी जनीच्या मंदिरात

जनीला न्हाई कुनी घेतली तेलफनी
विठूदेव माजा अंगं[2] उकलीतो वेनी

जनीला न्हायाला ग पानी न्हाई विसानाला
घेतली कावड विठू गेला जमुनाला

ववी मी गाईली ग नित विठ्ठल हिऱ्यायाला
आली ग रुक्मीन मोती गुंफीत तुऱ्यायाला

विठ्ठल देव बोलं नीस[3] रुक्मिनी गहू डाळ
साधूंची आली दिंडी ऐशी पक्वाज नऊशे टाळ

विठ्ठल देव बोलं सोड रुक्मिनी माजी बंडी
आल्याती साधुसंत संगं घेऊनी लाख दिंडी

विठ्ठल देव बोलं सोड रुक्मिनी माजा हात
आल्याती साधुसंत एवडी कथेला झाली रात

विठ्ठल देव बोलं सोड रुक्मिनी पागूयीट
आल्याती साधुसंत झाला रावळी[4] बोभाईट[5]

पंढरीचा हरी    हरी बसली दाटणी
पांडुरंगाची माज्या    चरणं येईना वाटणी

जिवाचं सुकईक[1]    तुला सांगतें वकीला
पंढरीच्या हरी    कधी भेटशी एकला[2]

देवाच्या देवळात    उभी राहिले एका कोनी[3]
माज्या संकटाला    नेत्रं उघडी विठू दोनी

आषाढीपासूनी    कार्तिकी दाटली[4]
पांडुरंगाच्या रथात    रखुमाई भेटली

आषाढीपासूनी    कार्तिकाची महिमा मोठी
दिंड्या उभ्या वाळवंटी    विठ्ठलाच्या

समोरल्या सोप्यामंदी    धयातुपाचे गेले पाट
पांडुरंगाच्या पंगतीला    साधु जेवीले तीनशे साठ

नाचत नाचईत    दिंडी आली कोण्या गावा
सावळ्या पांडुरंगा    झेंड्यांची कैची लावा

मुडदुंग्या परायास[5]    टाळकऱ्यांचा हात हाले
सावळा पांडुरंग    मधी विण्याचा चंद्र डुले

वाखरी गावच्या माळावरी    जरी रुमाल भुई लोळे
सावळा पांडुरंग    हरी रिंगण मधी खेळे

नाचूनी नाचूयीनी    दिंडी जायाची नेवाशाला
घाला बुक्क्याच्या पायघड्या    पंढरीच्या हावशाला

कोणाची ग झाली दिष्ट    माज्या त्या पंढरीराया
उतरीते लिंबलोण    आन् मी ववाळीते काया[6]

माज्या चुड्याची घडण    न्हाई कुनाला येणार
पांडुरंगानं पाठविलं    इंद्रसभेचे सोनार

पंढरपुरामंदी    कोण्या दरवाजानं जावं
विठू देवाच्या पायरीला    नित उभा नामदेव

विठ्ठलाच्या देवळात    मायालेकरं बारीला
पांडुरंगाचा माज्या हात    पक्वाजाच्या दोरीला

तुळशीच्या माळा    मी का पैशाला घेते बारा
देवा माज्या विठ्ठलाच्या    गळ्या घालीते तालीवारा

सकाळी उठूनी    सज[7] गेले मी भाईरी[8]
देवा माज्या विठ्ठलाची    नदरं पडली[9] पायरी

१. सुखदु:ख.   २. एकटा.   ३. एका कोपऱ्यात.   ४. गर्दी झाली.   ५. मृदंग वाजवणार
६. देह.   ७. सहज.   ८. बाहेर.   ९. नजरेस पडली.

देवाला मी जाती — दुपार झाली खरी
देवा माज्या विठ्ठलाचं — येनं राहिलं माज्या घरी

गोपाळपुरा जाया — जनीला झाली रात
पिरतीचा[1] पांडुरंग — नित लावी चंद्रज्योत

एकनाथाच्या मंदिरात — देव विठ्ठल गंध घाशी
पैठणी गावाला ग — ह्राईत्या चौदा वेशी

पांडुरंग म्हणे — दे ग रुक्मिणी धोतर[2]
दिंडी ग्यानूबाची आली — त्येला जातो मी सामोरं

विठ्ठल विठ्ठल — हाका मारीती राऊळात
सावळा पांडुरंग — उभा गोपाळपुरात

पंढरपुरात — कपीला गाय व्याली
विठ्ठलाच्या भोजनाला — दुधाची खीर केली

खांद्यावरी वीणा — हाती झुंबडा[3] जाईचा
सावळा पांडुरंग — कंथ[4] रुक्मिणीबाईचा

नऊ लाख मोती — विठू रायाच्या कंगणीला
भिम्मक राजानं — समींदर पाठवीला

नऊ लाख मोती — विठू रायाच्या कळसाला
चढता उतरता — गवंडीदादा आळसला[5]

विठ्ठल देव बोलं — नीस[6] रुक्मिणी गहूडाळ
ज्ञानोबाची आली दिंडी — हरीनामाचा कल्लोळ[7]

विठ्ठल देव बोले — दे ग रुक्मिणी माजी बंडी[8]
आपल्या राऊळी — आली आळंदीची दिंडी

## २

### संग्राहिका : श्रीमती जानकीबाई पाटील

पहिला माजा दंडवत — हाई इसाव्यापासूनी
सावळ्या पांडुरंगा — न्यावं रथात बसूनी

दुसरा माजा दंडवत — चंद्रभागेच्या आल्याड
सावळ्या पांडुरंगा — मला न्यावं पल्याड

तिसरा माझा दंडवत — चंद्रभागेच्या वाळवंटी
चंद्रभागेच्या काठी — झाल्या पुंडलिकाच्या भेटी

---

१. प्रीतीचा. २. महावस्त्र, उपरणे. ३. गुच्छ. ४. पतीं. ५. दमलाभागला. ६.
७. जयघोष. ८. [illegible]

चौथा माझा दंडवत नामदेवाच्या पायरी
हाका मारितो इट्टलाला चोखामेळा तो बाहेरी

पाचवा माझा दंडवत चढे घाटाच्या पायऱ्या
सावळ्या पांडुरंगा भेट द्यावीस सोयऱ्या

साव्वा माझा दंडवत उभी राहिली बारीला
माज्या ग दर्शनाची चिंता पडली हरीला

सातवा माझा दंडवत उभी राउळाच्या कोना
मला का भेट द्यावी इटवईल्या मोहना

आठवा माझा दंडवत उभी राहिली वाळवंटी
विठ्ठल देव माझा संतासंगती करी गोष्टी

नववा माझा दंडवत उभी साखळदंडापाशी
देवाचं नाव घेता जळं पातकांच्या राशी

धाव्वा माझा दंडवत राऊळात झाली दाटी
गोपाळपुऱ्यामंदी संतांच्या भेटाभेटी

आकरावा माझा दंडवत गरुडखांबाला घाली येडा
बोले सावळा पांडुरंग जनी आलीया वाट सोडा

पाऊस पडतो पंढरीच्या माळावरी
ज्ञानोबा नामदेव माझे भिजले वारकरी

पांडुरंग म्हणे ऐक रुक्मिणी झणत्कार
हाती वीणा टाळ आले आले ज्ञानेश्वर

पोथीला मी जाते सयांनू जागा धरा
सावळा पांडुरंग उभा चांदणीखाली हिरा

विटेवरी उभा वसुदेवाचा ताना बाळ
दोनी हाती धरी चिपळ्या वीणा टाळ

पाटच्या पाऱ्यामंदी कर्णा वाजतो मंजूईळ
सावळ्या इठुबाला दह्यादुधाची आंगूईळ

पाटच्या पाऱ्यामंदी कर्णा वाजतो सोनीयाचा
सावळ्या इट्टलाला आला निवद लोणीयाचा

माजं लोटांगण गाव वाखुरीपासुनी
सावळा पांडुरंग आला रथात बसुनी

दुकानदारांनू तुमी दुकान कलवा
देवा इट्टलाचा आला रथाचा हेलवा[१]

संग्राहिका : **सौ. राजाक्का देसाई**

पांडुरंग म्हणीत्याती
आपल्या दारी आल्याती
सोड रुक्मिनी माझी बोटं
साधू मोठं मोठं

पांडुरंग म्हणीत्याती
चंद्रभागेच्या तासावरी
सोड रुक्मिनी माझा हात
झाली कीर्तनाला रात

विठ्ठल म्हणीत्याती
आले ज्ञानोबा तुकाराम
ऊठ रुक्मिनी दिवा लाव
कीर्तना जागा दाव

विठ्ठल म्हणीत्याती
आली आळंदीची दिंडी
चल रुक्मिनी माडीवरी
पाहू चल घडीभरी

विठ्ठल म्हणीत्याती
राऊळात उभे
वाळगोपाळ येऊ द्या
बारीसाठी ते राहू द्या

पांडुरंग म्हणीत्याती
सोड रुक्मिनी माझा गळा
साधूसंतांचा आला मेळा

विठ्ठल म्हणीत्याती
सोड रुक्मिनी माझी मांडी
साधूसंताची आली दिंडी

विठ्ठल म्हणीत्याती
सोड रुक्मिनी माझी बोटं
साधू आल्याती तीनशे साठ

४

संग्राहिका : **सौ. कमलाबाई बडवे**

तुझ्या दर्शनाला वडाखालून माझी वाट
नामदेवाची पहिली भेट

वडाच्या झाडाखाली नामदेवाची पायरी
चोखामेळा उभा बाहेरी

साधूमध्ये साधू नामदेव साधू खरा
झाला पायरीचा चिरा

देवाच्या देवळात गरुडखांबाचा विसावा
कधी भेटशी केशवा

तुझ्या दर्शनासाठी उभी राहते एक्या कोनी
नेत्र उघड राजा दोन्ही

जाते कळसाला बघत

चला जाऊ गावा पाहू पंढरीचा राजा
हिरवा मंदिल तुरा ताजा

विटेवरी उभा कुण्या देशीचा हरिदास
कुणी म्हणेना खाली बस

पहाटेच्या पाऱ्यामंदी करा ताकीद गवळ्याला
दही दूध सावळ्याला

पहाटेच्या पाऱ्यामंदी करू नका गलबला
सया वारीला बोलावते वारुळाला जाऊ चला

पहाटेच्या पाऱ्यामंदी करा गवळ्याला ताकीत
काकड आरतीचा आता झालाया वकूत

गाला लावी बोट वंदीतसे पायाला
कोणाची झाली द्रिष्ट माझ्या पंढरीरायाला

५

**संग्राहिका : सौ. शशिकला पाटील**

दर्शनाला गेली मला राऊळी रात झाली
देवा माझ्या विठ्ठलानं मला गुजाला बैसविली

दर्शनाला गेली माझी एक पायरी चुकली
देवा माज्या विठ्ठलाच्या चंद्रहाराला दिपली

सावळ्या रूपाचा आढळ कुठे झाला?
सावळा पांडुरंग गंध किरटावरी लेला

जाईच्या फुलाच्या मी का करते उगा निगा
देवा विठ्ठलाला हार गुंफिला मनाजोगा

पहाटेच्या दळणाचा मला उल्हास वाटला
पांडुरंगाच्या आंगूळीला गवळी धारंला उठला

पहाटेच्या पारी कर्णा वाजतो घाई घाई
विठ्ठलाच्या आंगूळीला जातो घेऊन दूध धई

पहाटेच्या पारी कर्णा वाजतो कुसरी
देवा माझ्या विठ्ठलाची झाली आंगूळ दुसरी

पहाटेच्या पारी कर्णा वाजतो तातडीचा
देवा माझ्या विठ्ठलाला जातो निवद खिचडीचा

संग्राहिका : **सौ. नलिनीबाई शिंदे**

पहिला माझा नमस्कार पादुकावरी माळ
देवा माझ्या इठ्ठलाचा कळस सोन्याचा देतो ढाळ

दुसरा माझा नमस्कार या पादुकापासुनी
इठ्ठल रुखमाई आली रथात बसूनी

तिसरा माझा नमस्कार चंद्रभागा ग बाई
देवा दाखवा तुमचे पाय आलोया भेटीपायी

चवथा माझा नमस्कार चंद्रभागा बाई तुला
पांडुरंगाची पावलं देवा फिरून दाव मला

पाचवा माझा नमस्कार चंद्रभागा आरती
राही रुखमीण पांडुरंग दोनी आल्यात मूरती[१]

सहावा माझा नमस्कार नामदेवाच्या पायरी
इठ्ठल रुखमीण आले राउळा बाहेरी

सातवा माझा नमस्कार गरुडखांबाला टेकूनी
देवा माझ्या त्या इठ्ठलाच्या चंद्रहाराला देकूनी

७

संग्राहिका : **सौ. हव्वाबी खान**

उन्हाच्या पान्यामंदी चारी दरवाजे लाविल्याती
सोन्याच्या फरशीवरी देव इठ्ठल झोपत्याती

गोपाळपुरावरी जनाबाईला झाली रात
इठ्ठल देवाजीनी त्येनी लाविली चंद्रजोत

एकादशीबाई तुला केल्यानं काय होतं
सरगीच्या देवा यम आलेया मागे जातं

पंढरपुरामधी कशाची झाली चोरी
जनाबाईचा गेला तवा बोलला शिरीहरी

पंढरपुरामंदी हायत्या माळीनी उमारमा
इठ्ठल देवाचा करी फुलांचा पायजमा

१ मूर्ती.

आबीर बुक्याचा झाली गरदी सासनी

पंढरपुरामंदी वसतीला नाही जागा
इठ्ठल देवाजींनी बांधिल्या तुळशीबागा

रुखमीन माझी गोरी इठ्ठल कसा काळा
माणिक मोत्यांचा जडावा कोणी केला

८

संग्राहक : **श्री. ना. ना. शिंदे**

पोथी पुस्तकांचं वेड रुक्मिणीबाईला
पांडुरंगाच्या पायरीला नामा चाकरी राहिला

विठ्ठलदेव बोले ऊठ रुक्मिणी दिवा लाव
वारकऱ्यांना जागा दाव

दामाजीचं बोलावणं मंगळयेडचाचा आला तांगा
देव विठ्ठल बोलत्याती साडेनवाला येतो सांगा

विटेवरी नीट केळी कर्दळीचा गाभा
पांडुरंगाचं रूप सावळं दिसे शोभा

विटेवरी नीट उभा राहिला सोवळ्यानं
पांडुरंगा माझ्या तुला विनंती जिव्हाळ्यानं

९

संग्राहिका : **सौ. लीलावती पवार**

इट्टल इटंवरी चोखोबा भायेरी
ऊद कापराच्या वाती नामदेवाच्या पायरी

इट्टल देव बोलं, का ग रुक्मिणी अबोईला
गेलो होतो आळंदीला सव्वा महिना लागईला

इट्टल देव बोलं, का ग रुक्मिणी रागं रागं
गेलो होतो फुलबागं, आली तुळस माझ्या मागं

पंढरीचा देव नाही कुणाला लागत
देवा इट्टलाला माळ बुक्क्याची आगत

संग्राहिका : सौ. सजाबाई शामराव सावंत

विठ्ठल लेणं लेतो नऊ लाखाची बादईली
देव ग्यानूबा म्हाराजाला वारी आखाडी साधीईली

देवामंदी देव देव विठ्ठल लई काळा
त्येच्याबी आंगूळीला लागी कस्तुरी सव्वा तोळा

साखबीरीचा लाडू तो का ठेविला तांब्याआडू
सावळ्या इटूबाला जनीचं लई याडू

विठ्ठल माजा बाप रुक्मीन माजी माता
पुंडलीक बंदूजीचं दर्शन घ्या जाता जाता

ओवी उभ्यानं गाईली गरुड खांबाला राहिली
देव विठ्ठल रुक्मिनी जागी कवाची ती झाली

## ११

संग्राहिका : सौ. कुमुदिनी पवार

सरलं दळण दारी तुळशीला सांगा
आरती तुम्हांला पांडुरंगा

पहाटेच्या पान्यामंदी कर्णा वाजतो सोन्याचा
पांडुरंगाच्या माझ्या मुखी गोळा लोण्याचा

पहाटेच्या पान्यामंदी कर्णा वाजतो तातडीचा
पांडुरंगाला माझ्या नैवेद्य खिचडीचा

माझा नमस्कार रावळा बराबरी
पांडुरंगाच्या माझ्या जरी पोशाख अंगावरी

पांडुरंगाच्या पायरीला नामा बसले बिनघोरी
मनतिर्पती झाला हारी

पांडुरंग बोलत्याती चल जनी गवताला
चंदन गेला येली रावळी भोवताला

विटेवरी वीट उभा सये राहिला कवाचा
अंत कळेना देवाचा

विटेवरी वीट उभा राहिला केवढा
तान्ह्या बाळा एवढा

संग्राहिका : **सौ. शकुंतला बापूराव बाबर**

पहिल्या पंगतीला मी का घालिते रांगोळी
इठ्ठल पांडुरंग साधू गेल्याती आंघूळी

दुसऱ्या पंगतीला मी का टाकिईती पाट
बारस सोडायाला साधू जमले तीनशे साठ

तिसऱ्या पंगतीला मी का वाढिती तूपपोळी
बारस सोडायाला आले पंढरीचे वनमाळी

चवथ्या पंगतीला मी वाढिती दहीभात
बारस सोडायाला देव आल्याती एकनाथ

पाचव्या पंगतीला मी का वाढिती डाळवांगं
बारस सोडायाला देव आल्याती पांडुरंग

सहाव्या पंगतीला मी का वाढिती शाकभाज्या
बारस सोडायाला देव आल्याती धर्मराजा

सातव्या पंगतीला मी का वाढिती कडी वडी
बारस सोडायाला आली पांडुरंगाची जोडी

आठव्या पंगतीला केले सायास नानापरी
इठ्ठल पांडुरंग देव जेवती माझ्या घरी

नवव्या पंगतीचा देते सांगावा लावुईनी
यावं बारस सोडायाला देवा रुक्मिनी घेऊईनी

# केशीराजाची रुक्मिणी

[म्ही आपली साधीभोळी माणसं. गरिबीच्या संसारातील अशी. तर आम्हांला श्रीमं
घरचं कळावं कसं? पण म्हटलं, एवढी सगळी दुनिया पंढरीला लोटतीय दरवर्ष
णही यावं जाऊन. बघावं विठूदेवाचं घर. घ्यावं दर्शन. करावं चारचौघांच्याप्रमाणं चंद्र
न. घ्यावं देहभांड उजळून. बघावा राउळातील भक्तांचा दिमाख. पाहावी रुक्मि
वी जनाबाईची भेट. आणिक बघावी मनाला काही शांती मिळाली तर. म्हणून हा अ
मनी धरूनच मी पंढरीला जायचा बेत केलेला हं!

ल्हानपणापासूनच फुगडीझिम्मा खेळायला आमच्या आळीला ये म्हणून आम्ही रुक्मि
ावा दिलेला. आणिक हिऱ्यामोराची काचोळी घालून ती आली तरी आमचे डोळे दि
त की आम्हांला हेवा पण वाटायचा नाही हे पण आम्ही तिला कळवून दिलेलं.
च्या दामूजी सोनारानं साडेतीनशे मोती गुंफीत तिची एकेक बांगडी केलेली होती हे म
तरी आम्ही त्या दिमाखाचा धसका मनाला लावून घेतलेलाच नव्हता. कारण काय
ांला तिच्याबरोबर खेळायची लाज वाटू नये! हो, नाही तर ती डामडौलानं आली म
ही आकसून बसलो की खेळ उलगणारच! नाही का? म्हणून आम्ही आपल्या तयारी
ताना कोणसंसं बोलल्याचं आठवतं की, मोत्यांचे झुबके वाहीन म्हणून अंबिकेला
ीत न् नेत्राचं काजळ काढून व हाताची लेखणी करून रातोरात हरीला पत्रिका धाड
क्मिणी उगीच कुणी बोलावलं म्हणून यायचीच नाही. तरी पण आम्ही म्हटलं बघाव
ावून. येणं न येणं तिच्या मर्जीतलं. आपण चोख असावं. तर वर्षानुवर्ष नागार
यला असं बोलावणं करूनही ती आली नाही, तशी आम्ही ताडलं की, हे प्रकरण
व म्हणून. आणि त्या आधारावर भीत भीत विठूरायाच्या नगरीला गेल्यावर ती
ाही ही शंका बाळगूनच आम्ही जायचा बेत केलेला. म्हटलं बघू या तरी काय होतं. र
येऊन दिलं तिनं तर केशीराजा म्हणतात तो विठूदेव तरी येईल पुढं 'या' म्हणाय
काय?

ण बाई एकेक तिच्याएकी ऐकलं तशी काही हिंमत होईना हं! पंढरीच्या ठेंगण्या माळणी
ही आम्ही तिच्यापुढं पार बुटक्या आहोत असं वाटलं. खरं ना? नाही म्हणजे शे

काय पाड लागावा? हिच्या वडिलांनी पैस मैदानाची जागा बघून हिच्यासाठी पंढरी
वून दिलं न् हळदी-कुंकवासाठी आळंदी लिहून दिली म्हणजे जहागिरी केवढी म्ह
वी! पंढरपूर परगण्याचा सोन्याचा कळस दाखविताना ही म्हणे सांगते की, दीड लाख
च्या कापाला आहेत न् नऊ लाख मोती पंढरी नगरीच्या कळसाला गुंफताना गवंडी
ळसून गेला चढउतारीनं! म्हणजे हिचा हा दिमाख आणि आम्ही कशा तर लंकेच्या प
भू अशा! फुटका मणीही जवळ न बाळगलेल्या! माझ्यासारखीनं काय तिला बाभळी
ाचे दागिने घालून भागविलेली हौस सांगायची का लिंबोणीच्या फुलांचे गुंफलेले अल
च्यापुढे ठेवायचे? म्हणून म्हणते की, आपण आपल्या घरी सुखी असावं हे उत्तम.
लोभ पण नको अगर उणंपुरं बोलणंही नको.

आता कळलंय हे असं. मग खरं खोटं देवाला माहीत बाई! आम्ही काय सांगावं, नाही
हे दागिन्याचं न् पंढरीरायाच्या वैभवाचं सांगताना तिला तिचे वडील भीमकराजे म्ह
गतात की, मी तुला समुद्र आंदण दिला म्हणून हे वैभव! पण हिला माहेरचा अभि
ी? बाई बाई बाई! रुक्मिणी, खरंच तू अशी ग कशी? आणि केशीराजाच्या वैभ
ी दिपून जातेस न् ज्याला त्याला आपला मोठेपणा सांगतेस तर मग विठूदेवाबरोबर भ
का? काय म्हणून रुसायचं मेलं ते? कशासाठी? केवळ त्या बिचाऱ्या जनाईवरून?
ी ग अशी करूस तू रुक्मिणी! जनी फार शहाणी. मनाची मोकळी. तुझ्या पतिदेवानं
बाळ मानली न् तिच्याएकी तुझ्या मनात संशय दाटावा? काय बाई म्हणावं तरी तु
खुळेपणाला? वेडीच आहेस हं तू! खरंच! आमच्याजवळ याशिवाय दुसरा शब्दच
. हो बाई. मग तू काही म्हण.

कारल्याचा मळा पिकू दे मग तुला बाजूबंद करीन, गोपाळपुरी चल मग तुला भिंगाची
न, साजशिणगार लेऊन रथात बैस मग तुला पाहिजे तर रथाच्या खिडक्या उघडचा
न, जरतारी सव्वालाखाचं लुगडं घेईन असं काय काय माझा केशीराजा तुला सांगून
वण्या करतोय तर तू मेली रुसतेसच ग कशी? सगळी पंढरी नगरी धुंडून पदमतळ
तुझा हात धरून त्यानं ऊठ म्हटलं तरीही तू फुरंगटून बसावंस? छे बाई, सगळी न
तेय तुझ्या नवऱ्याला. चांगलं राउळात बसून विठूदेवाच्या बरोबरीनं मानपान घ्या
काय म्हणे अबीर बुक्क्याची गर्दी सोसत नाही! भले शाबास! अग, या सोपस्काराची
बघ अनुभवून! हो, बघ ना एकदा मनापासून. हातात रमा उमा माळणींनी गुंफले
ंच्या कंगण्या घालून बघ तरी. हो, बघ तरी मी म्हणते..तर ते राहिलं कुणीकडेच
देवाच्या पायाला लोणी चोळतानादेखील विचारतेस की, म्हणे जनी तुमची कोण म
ची तिच्यावर एवढी प्रीती. अग रुक्मिणी, फाटक्या बोतरांची जनाबाईची वाकळ दे
ा घरच्या गाद्यागिरद्यांपेक्षा आवडते. खरं ना? का बरं? सांग ना! मी सांगू?
ासारखी रुसत नाही. आणिक पोटच्या पोरीप्रमाणं देवाशी वागते. इमान राखते. म
तिला ऊन लागू नये म्हणून गोपाळपुराच्या वाटेवर चिंचबन आणि अंधाराची भीती
म्हणून चंद्रज्योत लावलीय देवानं. नाही का? शिवाय स्वतः तिची कामं करू लागतो
ीनं. का बरं? तिला हलकं पडावं म्हणूनच ना? म्हणून तू घे की जरा समजुतीनं आणि

ग बाई! चाललीस कुठं? राग का आला? नाही हं पुन: बोलायची तुला. कशी का वागे
तुला लखलाभ. मला थोडंच बरं-वाईट भोगावं लागणार तुझ्या घरचं? तर काय मेलं
देवाची हाक आली होय? जा हं! राउळात कथेचा बोभाटा झाला म्हणून देवाला प
का? जा हो, देऊन ये. . . काय म्हणालीस? सडा घालायचाय हळदीकुंकवाचा? क
येणार का आहे? . . . कोण? ज्ञानदेवांची स्वारी येणार आहे? अग बाई! मग जा
वाला महावस्त्र चटकन काढून दे आणि जा म्हणावं ज्ञानदेवाला सामोरं. आणि हे
स रंगमहालाच्या भिंती रंगवीत. तुझं मन तेवढंच रमेल. नाही तर खिडकीत बसून
च्या दिंडीची शोभा बघ जा बाई. फार चांगला देखावा असतो म्हणतात.
ण रुक्मिणीदेवी, त्या तुळशीला बरीक बोलू नको गडे. तुझा तिच्यावर पण उगीच राग
र्षी गोविंदाचं न् तिचं लगीन लागलं म्हणून तुझा मान कुठं गेला नाही ना? मग काय
ाक तुळशीबनात देवानं रात्र घालवली न् त्याच्या शेल्याला काळा डाग पडला म
काय गेलं? उलट तू तो शेला सोन्याच्या शिळेवर बसून धू जा की चंद्रभागेत! ख
ला किती आनंद वाटेल आणि चंद्रभागा पण हारखून जाईल अगदी! बघच तू. लाट
घडचा घालून नाही तिनं मग फुलांचं आंथरूण घातलं तर मला विचार. अग, तु
ंच्या प्रीतीला बघून चंद्रभागाही सुखासमाधानानं हसते. तिला बरं वाटतं. तिचं म्हणण
खंड असा पांडुरंग तू आपल्या मनानं धनी म्हणून निवडला आहेस तर त्याच्या इतम
ा वागव म्हणून.
विठूदेव जेव्हा हातात टाळवीणा घेऊन भक्तमंडळींच्या घोळक्यात कीर्तनाला उभा र
ा ज्ञानदेव अभंग बोलतात आणि आकाशीचा चंद्र डोलू लागतो. तर त्या भाग्याच
कोण. म्हणजे हे ऐश्वर्य तुझ्या एकटीच्या मालकीचं आहे रुक्मिणी. आणि हे बघ रुक्
ाता ऐकलंय की, तुझ्या घरी बायका डोहाळे गायला लागल्या आहेत म्हणून. खरं क
झालं बाई! कृष्णदेव तर सोनीयाचा दिवस आला म्हणून सुखावला आहे. अठ्ठावीस
वर उभ्या असलेल्या देवानं तुझ्यासाठी द्राक्षअंजिराच्या बागा लावल्यात म्हणे आणि
ळीक बंधू केळी नारळी जावाजावांच्या घोळक्यात राखण करतोय म्हणतात एकेका
ाची. तुझ्या आवडीची चव कशी धा-धावून येतेय तुला सामोरी पाहिलीस? म्हणून म
ला तुझ्या रुसण्या-फुगण्यात दह्यादुधाची न् गार पाण्याची आंघोळ होणार नाही हे
वत: आणि खुशीनं ऐस. आम्ही तुला मोत्यापोवळ्यांची न् खणानारळाची ओटी
र आहोत. ऐकलंस ना?
ण थांब, हे लांबूनच बोलणं पुरे. विठूदेवाचा एकदा सोडून दोनदा सांगावा आलाच
आम्ही आळीतल्या सगळ्याजणी येणार आहोत तुझ्या घरी. माहेरवाशिणी म्हणून
ामाची गजनी चोळी म्हणून आम्ही लेवूच; पण तू दाराशी येऊन आम्हांला "कधी अ
?" असं विचारीत पोटाशी धरलं पाहिजेस हं! मग तू बघच पाची पक्वान्नांनी भर
चांमधून तुला आणलेली बुत्ती कशी चवीची वाटेल ती!

१

संग्राहिका : **सौ. गंगूबाई बाबर**

रुक्मिनीला दिली पंढरी पाहूनी
हळदीकुंकवाला दिली आळंदी लिवूनी

विठ्ठलाचं राज रुक्मीन सांगती आईला
दीड लाख मोती तिच्या चोळीच्या बाहीला

विठ्ठलाचं राज रुक्मीन सांगती बापाला
दीड लाख मोती माझ्या झुब्याच्या कापाला

विठ्ठलाचं राज रुक्मीन सांगती बंधूला
सोन्याचा कळस पंढरी गावाला

विठ्ठलाचं राज रुक्मीन सांगती भैनीला[१]
मोत्या पवळ्यांची रास तिच्या वेनीच्या गोंड्याला

रुक्मिनी माजे लेकी भिम्मक राजा म्हनी
अग पारकीला[२] साऱ्या पिरतीमीचा धनी

नऊ लाख मोती विठूरायाच्या कळसाला
चढता उतरता गवंडीदादा आळसला

लाख लाख मोती विठू देवाच्या पगडीला
भिम्मकराजांनी समींदर पाठवीला

पंढरपुरामंदी कोन सोन्याच्या जोडव्याची
राही रुक्मीन रानी विठ्ठल राजसाची

पंढरपुरामंदी गल्लोगल्लीनं कासार
रुक्मिनी घाली चुडा सव्वा म्हईन्याला उदार[३]

शिनगारील्या रथामंदी न्हाई रुक्मिनीची न्हानी
आंगूळीचं तिचं पाणी चंद्रभागेत इंद्रावनी

दामूजी त्या सोनारानं समींदर उघडीला

रुक्मिनी लेणं लेती सोन्याचं गोठतोडं
नऊ लाख पिरतिमी तिच्या पंढरीखाली मोडं

रुक्मिनी लेणं लेती हिऱ्यामाणकांच्या पाटल्या
पंढरीच्या रथामंदी व्हाईत्या खिडक्या दाटल्या

रुक्मिनी धुणं धुती देव इठ्ठल म्होरं बसं
दोगांच्या पिरतीचं चंद्रभागाला येतं हसं

रुक्मिनीचा मोती हारपला[1] वाळवंटी
देव विठ्ठल हिकमती डाव्या पायानं वाळू लोटी

रुक्मिनीच्या मंदिरी व्हाईती चांदीचे गडवे पेले
जनाबाईच्या घरी देव मोग्यानं[2] पाणी प्याले

रुक्मीन जेवू वाढी निरशा[3] दुधामंदी केळं
पांडुरंगाला आवडलं जनाबाईचं ताक शिळं

रुक्मिनीच्या मंदिरी गाद्या गिरद्या बक्कळ[4]
पांडुरंगाला आवडली जनाबाईची वाकाळ[5]

रुक्मिनी जेवू वाढी साखरसोजीच्या पाळचा मोप[6]
जनाबाईच्या कण्यांसाठी देव राखूनी जेवी भूक

रुक्मिनी म्हनी देवा तुमा जनीची लई गोडी
रावळाभाईरी[7] स्वत्ता[8] बांदूनी द्याजा[9] माडी

रुसली रुक्मीन रावळाखाली गेली
पिरतीचा पांडुरंग पदर जरीचा तिला घाली

रुसली रुक्मीन जाऊन बसली पानंदीला
सावळ्या विठ्ठलाला जाऊ दीईना आळंदीला

विठ्ठलाचं मुख रुक्मीन पहाते भिंगात[10]
दोगांच्या पिरतीवानी जोडा न्हाई पिरतीमीत[11]

विठ्ठलापासूनी ग न्हाई रुक्मीन ती शाणी
तिनं मेण्यात केली न्हाणी तुळशीबनात नेलं पाणी

आकाड एकादशी सये विठ्ठल लालायाला
रुक्मीन लावी शिडी वागाटयाच्या येलायाला

---

१. हरवला. २. मातीच्या भांडयाने. ३. बिनपाण्याचे, ताजे. ४. पुष्कळ. ५
तयार केलेले पांघरूण. ६. पुष्कळ. ७ देवळाबाहेर. ८. स्वतः. ९. दे जा.
११. पृथ्वीवर.

ल देव बोलं जनजना[1] दोघांसाठी

ी रुक्मीन जशी आगीन तापली
देवाच्या मांडीवर तिनं राधिका देखीली

ी रुक्मीन देवाजवळी बसयीना
ीर बुक्क्यायाची गर्दी नारीला सोसयीना

गोरी रुक्मीन काळ्या विठ्ठलाला दिली
ा पवळ्यांची ग कोनी जडाजड[2] केली

शेर मोतीयाच्या रखमाबाईच्या बुगड्या
याला बंदोबस्त ठेवा खिडक्या उघड्या

ीनबाई बोलं भल्यापणानं देवा वाग
ीकुंकवाचं शेल्या पडल्याती डाग

मिनीची साडीचोळी सत्यभामेला दोरयीवा
ी सखीला ग थंड पाण्याचा गारवा

ी रुक्मीन ती का बसेना पालखीत
चा पांडुरंग रथावरूनी देतो हात

ी रुक्मीन ती का दिंडीरबना गेली
किष्णाच्या मांडीवरी तिनं मंदीरी देखीली

ी रुक्मीन गेली तुळशीला खेटूनी
चा पदर आल्या मंजुळा तुटूनी

सये जाऊ पाहू विठ्ठलाचं शेजघर
ाई घालीती समयीला मोगरेल[3]

मिनी म्हनीती काय निजलासी देवा
ी चंद्रभागा आल्या दारामंदी नावा

ीन म्हनीती माजा पुंडलीक बुडाला
ी चंद्रभागा वेढा वेशीला पडला

ता धर्म रानी रुक्मिनीला पुसा[4]
ीच्या पानावरी हरी सोडविला कसा

मिनीसहित देव विठ्ठल कुठं जातो
ांच्या घरी राजस[5] यज्ञ होतो

मिनी शहाणी पुसे आपुल्या बापाला
कर्ण वारू[6] पित्या कोणाच्या रथाला

---

ाय, लोक. २. गुंफण. ३. वासाचे तेल. ४. विचारा. ५. राजसूय. ६. घोडा.

संग्राहिका : **सौ. यशोदा पाटील**

सोन्याची आंगठी ती ग कशानं झिजली
हळदकुंकवाची रास रुक्मिनीनं मोजीली

रुसली रुक्मीन गेली मंगळवेढ्याला
पिरतीचा पांडुरंग जीन घालीतो घोड्याला

रुसली रुक्मीन सत्यभामाला बरं झालं
दोघीच्या भांडणाचं पांडुरंगाला हासू आलं

विठ्ठल म्हणत्याती ऊठ रुक्मिनी दिवा लाव
साधू-संताला जागा दाव[1]

विठ्ठल इटेवरी उभा ऱ्हाईला कवाच्यानं[2]
रुक्मीन बाई बोलं न्हौती[3] पंढरी तवाच्यानं

रुक्मीन धुनं धुती देव विठ्ठल उभा मागं
दोघांची पडछाया पडली चंद्रभागं

विठ्ठल म्हणे सोड रुक्मिनी माझा पटका
आले वारकरी पंढरीत झाला गलका

रुक्मिनीला मागयीनं काशीखंडाचं आलं ग्याव
कोऱ्या कागदी काळी शाई वर विठ्ठलाचं नाव

रुक्मिनीची साडीचोळी नऊ लाखाची जरतारी
देवा त्या भिम्मकानी लेक थोराच्या दिली घरी

गोपाळपुरी जाया रुक्मिनीला ग झालं ऊन
देवा माज्या विठ्ठलानं सये लावीली चिंचबनं

विठ्ठला शेजारी रुक्मीन बसली भारानं
पंढरपुरामंदी बुक्का विकीती शेरानं

पंढरी पंढरी विठू रायाची नगरी
रुक्मीन बाईनं भरल्या बुक्क्याच्या घागरी

पंढरीची वाट एवडी कशानं वली झाली
रुक्मिनी न्हालीधुली केस वाळवीत गेली

शेर सोनीयाच्या रुखमाईच्या पाटल्या
देवा विठ्ठलाच्या किती मोहरा आटल्या

शेर सोनीयाच्या रुखमाईच्या खुट्टावळ्या[4]
देव माजा विठ्ठल हिंडं जव्हाऱ्याच्या आळ्या

शेर सोनीयाचं रुखमाबाईचं जिबी गोंडं[5]
देवा विठ्ठलाला राज पंढरीचं दंडं[6]

---

१. दाखव. २. केव्हापासून. ३. नव्हती. ४. कानातील दागिना. ५. वेणीचा गोंडा. ६. श

## संग्राहिका : सौ. शरदिनी मोहिते

रुसली रुकमीण जाऊन बसली पानंदीला
माझ्या विठ्ठलाला जाऊ देईना आळंदीला

रुकमीण धुणं धूती हाती सोनीयाची शीळ
जनीच्या लुगड्याला देव विठ्ठल घाली पीळ

रुकमीण लेणं लेती सोन्याचे गोट तोडे
नऊ खंड पिरथिमी तिच्या पांढरीखाली मोडे

रुकमीण लेणं लेती सोन्याच्या पाटल्या
पंढरीच्या रथाच्या साऱ्या खिडक्या दाटल्या[१]

ऱ्हाई रुकमिणी परास सत्यभामाचं रूप चढ
देवाच्या अंगनात कानोपातराचं झाड

गोरी या रुकमीण काळ्या विठूला कशी दिली
मोहर मोत्यांत मिसळली

रुकमिणी नेसली नऊ लाखाची बादली[२]
सावळ्या विठ्ठलाला आषाढी साधली

रुसली रुकमीण गेली बापवाड्या
सावळ्या विठ्ठलानं पाठविल्या रथगाड्या

पांडुरंग म्हनी अग अग तू भिल्लीनी
पाठीवर वेनी रूप दिसतं रानीवानी

पिरतीचा भाव रुक्मीन पायाला लोणी लावी
सत्य सांगा माझ्या स्वामी जनी नात्यानं कोन व्हावी
देव गळ्याची देतो आन जनी आमुची लेक व्हवी

रुकमीण लेनं लेती सिर्सुफळाच्या[३] वाळे वाक्या
रखमाबाईला वर केला गोकुळाचा गाईराख्या

रुकमीण लेनं लेती सिर्सुफळाच्या[३] मुद्या झुवे
पिरतीचा पांडुरंग देव बवल्यावरी[४] उबे

पुरनाची पोळी विठू ठेवतो काढूनी
रानी रुकमीण म्हनीती देते जनीला वाढूनी

साखरेचा लाडू देव ठेवतो मांडी आड
रानी रुकमीण बोलती त्याला जनीचं भारी याड

देव विठ्ठल बोलत्याती माझ्या जनीला ऱ्हाई कुनी
तुळशीच्या वनी अंगं उकलीतो वेनी

---

१. गर्दी जमली  २. जरीकाठी महावस्त्र  ३. एका गावाचे नाव  ४. बोलले

सावळा इठू माजा तो का जनीच्या मंदिरात

रुसली रुक्मीन ती का जेवीना दूधपोळी
इट्ठल देव माझा जनीची शिवी चोळी

थोरली रुक्मीन पडे तुळशीच्या पाया
दानाला दिले श्रीरंग चला हरीला सोडवाया

रुक्मीन बोले देवा तुझी पिरीत कुणाची
घरला येती जाती माझी सगळी गुणाची

रुसली रुक्मीन हिचं रुसनं वंगाळ[१]
देवा इट्ठलाला गार पान्याची आंगूळ

रुसली रुक्मीन जाऊन बसली डगरीला[२]
इट्ठल धरी हात हासू आलं या नगरीला

शेरभर सोनं रुखमाबाईच्या अंगावरी
असा ढाळ देतो सूर्यचांदवा अंगावरी

इट्ठल देव बोले चल रुक्मिनी माडीवरी
ध्यानूबाचा सोळा[३] आला हवा पाहू या घडीभरी[४]

रुक्मीन बोले देवा सोसना मला दाटीवाटी
इट्ठल देव बोले यात्रा भरली दोघांसाठी

## ५

संग्राहिका : **सौ. अनसूया सकपाळ**

रुकमीण लावी दिवा आपुल्या महालात
विठोबाला झाली रात पंढरीच्या बाजारात

रुकमीण म्हणे देवा शेला कशाने ओला झाला
जनीच्या मंदीरी पाऊस बरसला

साईच्या भाताची आवड देवाला
बारस सोडायला चला जनीच्या गावाला

१. वाईट. २. उताराला. ३. सोहाळा. ४. घटकाभर.

घरात सोडूनी देव [illegible] दुपारी
जनीच्या वाड्यात देव डोलती[1] दोपारी[2]

गाद्या सतरंज्यांच्या रुकमिणी घाली घड्या
देवाला आवडती जनाबाईच्या गोधड्या

सोळा सहस्र नारी रथाच्या दूर दूर
रुकमिणी पट्टराणी आहे देवा बरोबर

६

संग्राहिका : **सौ. कुमुदिनी पवार**

सोळा ग सहस्र नारी सोळा सहस्र यांच्या खोल्या
रखमाबाई बोले कोण्या मंदिरी मौजा केल्या

सोळा ग सहस्र नारी नाही भोगीत श्रीहरी
जळती समई रुकमिणीच्या मंदिरी

जाईच्या फुलाचा रावळी झाला सडा
कानाड्या रुकमिनीचा सुटला बुचडा

उजेड पडला पांडुरंगाच्या उशीला
कानाड्या रुकमिनीच्या चंद्रकोर केसाला

रुकमीन घेती नाव तुम्ही आयिका साऱ्या जनी
विटेवरी हरी अवघ्या पिरतीमीचा धनी

रुकमीन लेनं लेती सोन्याचं कारलं
पांडुरंगानं आनीलं राम अवतारी डोरलं

नखाची लेखनी नेतराची शाई कोऱ्या कागदी लिहिलं
कानाड्या रुकमिनीचं पांडुरंगाला पत्र गेलं

रुकमिनीला साडी चोळी सत्यभामाला हिरवा बांड
तुळशीबाईला वाहायाला केलं रेशमाचा कांड

रुकमीन बोलती देवा तुमचं यडं गानं
तुळशीबाई संगं वर्षी लावता लगीन

तुळसबाई बोलती रुकमीन कशानं आहे थोर
सावळा पांडुरंग आदी लेत्यात माझा हार

तुळस बोलती रुकमीन कशानं थोरली
माझ्या मंजुळाची तिच्या नथीला आरली

१. डुलक्या घेतात. २. दुपारी.

धरला रुकमीन पड तुळशीच्या पाया
देव गेले दानाला चला जावू सोडवाया

रुकमीन नार बोले देवा कीर्तनाला जाता
गळ्यातली तुळशीमाळ प्रीतीची संगं नेता

रुकमीन नार बोले देवा कीर्तन झालं काल
तुळशी मावलीनं धुतला रंगम्हाल

## ७

संग्राहक : **श्री. बाबासाहेब बापूसाहेब देसाई**

रुसली रुक्मिणी गेली मंगळवेड्याला
पिर्तीचा पांडुरंग जीन घालीतो घोड्याला

पंढरीला झाली चोरी गेला देवाचा शिरोमनी
रुक्मीण बोलती जनीवाचूनी नेला कोनी

पंढरी झाली चोरी रुक्मिणीचा नेला तवा
विठ्ठल देव बोले दौंडी पिटवा नामदेवा

चंद्रावळीच्या रूपासाठी देव झाल्याती कोलाटी
भरल्या पेटेमंदी खेळ मांडिला उमाटी[१]

रुक्मीणबाई बोलं देवा आवड कोणाची
उनात घाली तप माझी तुळसा गुणाची

## ८

संग्राहिका : **सौ. शांतादेवी बाबर**

रुकमीन लेनं लेती शेसफुलाच्या येलवाक्या
पिर्तीच्या पांडुरंगा यावं म्हनती गाईराख्या

शेर सोनीयाचा रखमाबाईचा गजर
इठ्ठल देवाला दिली पंढरी जागीर[२]

शेर सोनीयाचं रखमामाईचं चिलगोंडं[३]
इठ्ठल म्हाराजाला पंढरीचं राजदंडं

---

१. उंचवटयावर, टेकावर. २. जहागीर. ३. वेणीचे गोंडे.

रुकमीनबाईचं सव्वा तोळ्याचं डोरलं
विठ्ठलरायाचं नाव सर्वांत थोरलं

सिनगारिला रथ, रथा जरीची फडकी
रुकमिनीपरास जना देवाची लाडकी

सिनगारिला रथ नथ येशीत थटली
सावळी रुकमीन चुडा लेताना उठली

रुसली रुकमीन बसेना विठूच्या पंगतीला
जाऊन बसली चंद्रभागा संगतीला

रुकमीन धुनं धुती दरवळे चंद्रभागा
देवा विठ्ठलाचा झगा धुती मनाजोगा

गोपाळपुरामदी रखमाईला झालं ऊन
देवा माझ्या विठ्ठलानं लावलं चिंचपान

रुकमीन नोवरी संगं शोभे बाळराणा
रुकमाईनं पारखिला गोकुळीचा राणा

पांडुरंगाचं लगीन चंद्रभागे आला पूर
कुडिनपुरा जाया देव उभा रस्त्यावर

शेरभर सोनं देवी रुकमाबाई लेती
तुळशीची माळा तिच्या कंठी ढाळ देती

## ९

संग्राहिका : **सौ. कमलाबाई बडवे**

रुक्मिणीचं लेणं नऊ लाखाची कोईरी
मोती भांगाला दुहीरी

रुक्मिणीचं लेणं नऊ लाखाची बुगडी
खिडकी भांगाची उगडी

रुक्मिणीची चोळी कुन्या शिंप्यानं शिवली
वर आळंदी लिवीली

रुक्मिणीची चोळी टिपा पडल्या दाट दाट
वर काढीला हरिपाट

रुक्मिणीची चोळी टिपा पडल्या लांब लांब
वर काढीला गरुडखांब

रुक्मिणीची चोळी शिवता गेली सूद

संग्राहिका : **सौ. शशिकला पाटील**

गोपाळपुरा जाया रुकमिणीला झाली रात
देवा माझ्या विठ्ठलानं लावियली चंद्रज्योत

गोपाळपुरा जाया रुकमिणीला झालं ऊन
देवा माझ्या विठ्ठलानं लाविलं चिंचबन

रुसली रुकमीण गेली दिंडोरी वना
सावळा पांडुरंग घेतो पालखीसंगं मेणा

रात्री सपान पडईलं मी का सपनी झाली दंग
गरुड खांबावरनं आले बसून पांडुरंग

## ११

संग्राहिका : **डॉ. सरोजिनी बाबर**

रुकमीण जेवू वाढी निरशा दुधामंधी केळं
पांडुरंगाला आवडलं जनाबाईचं ताक शिळं

रुकमिणीचा मोती हारपला वाळवंटी
विठ्ठल हिकमती डाव्या पायानं वाळू लोटी

रुकमीण लेणं लेती सोन्याचे तोडे
नऊ खंड पिरथीमी तिच्या पंढरीखाली मोडे

कोटयानुकोटी सोनं देवाच्या कळसाला
रुकमीण बोलती गवंडीदादा का आळसला

सत्यभामा हिंडं बामनाच्या आळी
कुणी पाहिला का वनमाळी

सत्यभामा हिंडं गवळ्याची घरं
कुणी पाहिला का सारंगधर

राही रुकमिणीपरीस सत्यभामा किती हट्टी
नारदाच्या घरी देव टाकिले घाणवटी

राही रुकमीण म्हणती अवो सत्यभामाबाई
पती दिलेला दानाला कुणी ऐकीयला नाही

राही रुकमीण बोलती अवो सत्यभामाबाई
कसा दानाला दिला पती तुझा एकलीचा नाही

# भीम्मकबाळी

## निवेदिका : कु. विद्या देसाई

दीची गोष्ट आहे. गोकुळातील कृष्णदेवाच्या घरची. त्याच्या आणिक रुक्मिण
ीतीची. म्हणजे त्याचं असं झालं की, सत्यभामेच्या रंगमहालात कृष्णदेव आलेला.
ऱ्या सगळ्या राण्या जमलेल्या. त्या घोळक्यात कृष्णदेव सिंहासनावर बसलेला
ण्याहून बोलणं निघालं म्हणतात.

सत्यभामा कृष्णदेवाला म्हणाली, "देवा, तुमची माझी प्रीत कशी म्हणावी?" तशी कृ
ा. म्हणाला की, "तू मला आवडतेस. गुळासारखी." सत्यभामा हे ऐकून हारखली. म्हण
ीनं--यज्ञजननीनं--कृष्णदेवाला विचारलं, "आणि मी कशी देवा?"

धासारखी." कृष्णदेवानं उत्तर केलं.

असं मग दिवसभर चाललं. कुणाला काही कुणाला काही असं उत्तर आलं. सगळ्या
दल्या.

होता होता मग रुक्मिणीची पाळी आली. तिनंही देवाला तोच प्रश्न केला. आणि कृष्ण
तिला उत्तर केलं, "जगातील उत्तम लवणाप्रमाणं तू मला लाडकी आहेस."

पण बाई रुक्मिणीला ते खपलं नाही. ती क्रोधायमान झाली. संतापानं खाली कोस
कृष्णदेव मनातून चरकला. असं बरं नाही म्हणाला. भीम्मकबाळी सुंद झाली.

तक्यात देवकीमाता आली. झाली गोष्ट तिला कळली. तिनं मग कृष्णदेवाला शां
लं. रुक्मिणीची समजूत करावी म्हणाली.

तिनं मग आपल्या हातानं सोन्याचं घंगाळ काढलं. त्यात पाणी विसणलं. कृष्णदे
ोळ घातली. रुक्मिणीला या चक्रपाणीचं बाळपण ऐकवलं. सोळा सहस्र नारी तुझ्या
त म्हणाली. तू माझी लाडकी सून. तुझा वडीलकीचा मान. तर तूच सगळ्यांत माना
पण रुक्मिणीचं मन तेवढ्यामुळं मोकळं झालं नाही. तरी पण मग ती उठली. कृष्णदे
ओळखलं. केशरी गंध लावला. त्यानंही तिची समजूत घातली.

म्हणताना मग देवकीनं युक्ती काढली. पाची पक्वान्नांचं भोजन तयार केलं. सोन्याची
ली. चंदनाचे पाट घातले. रत्नजडित रांगोळी घातली. हिऱ्यामाणकांच्या वाट्या घे
ापवळ्यांनी जडवलेली झारी पाणी भरून आणली. आणिक कृष्णदेवासह सगळ्या सु

नानापरीची रायती, कोशिंबिरी, सांडगे, कुरडया, लाडू, करंज्या,
असं काय काय सगळं वाढलं. निरनिराळ्या शिकरणी वाढल्या, फळं वाढली
कशातच घातलं नाही. त्या कारणानं कशालाच चव येईना. सगळ्यांनी
तशी देवकी म्हणाली, "मीठ खारट. रुक्मिणीसारखं." आणि मग त्या सग
तशी एकट्या रुक्मिणीला जवळ घेत तिनं बाकीच्यांना म्हटलं कसं, "ऐका
सांभाळा. मी हिला घेऊन तीर्थयात्रेला जाते."

परंतु कृष्णदेवानं तिला अडवलं. म्हणाला, "आई, अग मी तिथं रुवि
घेऊन चल."

झालं! एवढ्या एका बोलण्यानं रुक्मिणीला कोण आनंद झाला! तिनं
विडा करून दिला. देवकीच्या पाया पडली. चुकलं म्हणाली.

आणि मग एक दिवस काय झालं की, रुक्मिणीला खूष करायचं कृष्णदे
आलं तर त्यानं जगातील सगळ्या मिठाचा ढिगारा रुक्मिणीच्या महालात
गोकूळ रुक्मिणीच्या दाराशी आलं. तिच्या नावाचा डंका वाजला.

त्यासरशी ही भीम्मकबाळी एवढी हारखली, एवढी हारखली की, तिनं
वाटलं. कृष्णदेवावर ती प्रसन्न झाली.

सगळीकडे मग आनंदीआनंद झाला. रुक्मिणीनं न् कृष्णदेवानं मग सुख
तसे ते तुम्हाआम्हांला पण पाहायला मिळोत.

# पंढरी पंढरी, विठूरायाची नगरी!

मच्या घरच्या माणसांनी पंढरी एकदा सोडून दहादा केली असेल. पण म्हणून आ
मनानं आम्हांलाही कधी चला म्हटल्याचं आठवत नाही. पण गंमत काय झाली की, मा
लाच विठूदेवानं एक सोडून दोन चिठ्या पाठवून आम्हांला या म्हटलं. म्हणताना घ
सांचा निरुपायच झाला. संगं पीठकुट आणि कपडालत्ता घ्यावा त्याप्रमाणं आम
त्यांनी घेतलं ! तर हो ! मग आमचा आनंद काय सांगावा? अंहं! सांगून जमायचं ना
लं काही ऐकून पण कळायचं नाही.

र सांगायचं म्हणजे वटीच्या गूळशेंगा खात आम्ही पंढरीची वाट धरली. झिरी
सात चालताना शाडू मातींनी रंगलेली पावलं बिगीनं उचलली. झम्माटच्यानं निघालो
त आमच्या मनात ऐकल्या गोष्टींनी धुमाकूळ मांडून सोडला. पंढरी, विठूरायाची न
असेल न् कशी नाही या विचारानंच मन भांबावून गेलं.

आम्ही वर नेहमी वडीलधाऱ्यांच्याकडून ऐकलेलं की, पंढरपूर परगणा आहे. आणि
च्या दरवाजावर मोत्यांचा खेळणा टांगला असून कुणी तरी परशुरामाला हालव
ीत म्हणे स्वतः सैंपाकाला गुंतलेलं आहे! म्हणजे काय काय भानगड आहे कुणाला ठ
हांला कसं मेलं भुलल्यागतच झालं बाई.

अठ्ठावीस युगं विटेवर उभ्या असलेल्या विठूदेवाला म्हणतात की, फुलांचा पाय
तात! . . . आणि त्यासाठी पंढरीच्या रमा उमा माळणी फुलांच्या पाट्या डोईवर
ानं राउळाला येतात! म्हणजे एकेक नवलच म्हणावं हं! आमच्या घरी देवपूजेला चा
मिसळायची मारामार तर हा जामानिमा आम्ही कुठला हो पाहिलेला ? त्या कारणान
नेनंच खुळंभैरं झालेलं आमचं मन जेव्हा तुळशी बनात जाऊन स्थिरावलं तेव्हा जीव
ा. मनाची उलघाल कमी झाली. खरं ना!

ुळशी मंजिऱ्यांचा मधुर सुवास आम्हांला ठाऊक होता आणि त्यांचा गुंफलेला हा
ही पाहिलेल्यातला. तरीदेखील पैस मैदान बघून टाळमृदंगांच्या साक्षीनं वसविलेल्य
ीतलं तुळशीबन कसं होतं हरी जाणे बाई! म्हणून मग साधुसंतांच्या घोळक्यात टाळ
चंद्राप्रमाणं डोलणाऱ्या विठूदेवालाच आम्ही मनोमनी विचारलं की, तुमच्या नगर

पैशाला मिळणाऱ्या नऊ नऊ माळा घालताना हात पुरेना तर खाली बैस म्हणून सांग
ूदेवाला तर मग हे विचारायला काहीच हरकत नव्हती. पण वाटेत कुठला विठूदेव भेटाय
णि पंढरीनगरीचा सोन्याचा कळस तर अजून नजरेच्या टप्प्याखालीही न आलेला!
रणानं आमच्यासंगं आलेल्या लोकांना काही विचारावं असा बेत केला. हुरडचाला आले
शीबनातील भोरडचा घालवाव्यात म्हणून वीणा वाजवणारा विठूदेव ह्या लोकांना म
ा. पंढरीनगरी ओळखीची होती. म्हणताना विठूदेवाच्या रथाचा हेलवा आल्यावर तिथ
ानदारांची जशी धांदल उडे तशी आमची पण उडाली. कारण हरीच्या रथाला लक्ष
लेल्या विठूदेवाच्या नगरीत रस्ते मोठे न् सगळीकडे ऊदकाडचांचा घमघमाट सुट
ी वदंता आम्ही ऐकलेली. तशात दर वाटेत जिकडे तिकडे जाई फुललेली. म्हणजे
्हांला सगळं नवीनच म्हणावं की! शिवाय पंढरीला गेल्यावर मावशीला चांदीच्या कळ
ोळ घालायची, बापाजींच्याकडून चंद्रभागेच्या तासात गाईला कडबा सोडायचा, बं
ीचा नारळ फोडायला लावायचा असल्या कितीक गोष्टी आमच्या कानावर आले
णताना आपल्या रथाला वाघ जुंपीत नवल विकणाऱ्या विठूदेवापुढं आमची हो दाद
ावी? खरं का खोटं! तरी पण मग धीर धरला. वाखुऱ्या वडचावर फुलांचं आंथ
्यामुळं येणाऱ्या ज्ञानदेवाच्या दिंडीला सामोऱ्या येतेल्या विठूदेवाच्या जोरावर आम्ही त
कात जाऊया म्हटलं. आणिक बुक्क्याच्या रांगोळीच्या खुणेनं पंढरीतील विठूदेवाचं र
ायचा बेत केला. म्हटलं मग काय व्हायचं ते होऊ दे.

पण मग असल्या विचारांनी उरी दाटलेला कल्लोळ दाबून धरताना पंढरीच्या राउळा
ूदेव नजरेत आला! त्याच्या चंद्रहारानं डोळे दिपून गेले आणि मग जिवाची अशी ध
ाली की काय बोलावं न् कसं सांगावं? मनाची मेली तालेवारीच अशा एकी आटपेना 

*

१

## संग्राहिका : कु. विद्या देसाई

पंढरी पंढरी नऊ लाखाचा कळस
देवा विठ्ठलानी वर लावीली तुळस

पंढरपुरामंदी काय ग दिसतं हिरवंलाल
देवा विठ्ठलाची झेंडू फुलली मखमल

पंढरीची वाट सये चालाया चांगली
हातात तुळशीमाळा जाई वाटेत फुलली

पंढरीची वाट हितं चालाया चांगली
अशी शाडूमाती माजी पावलं रंगली

पंढरीला ग जाया उभं रहावं धरमशाळं
इट्टल देव बोले कवा आलीस लेकीबाळं

पंढरी पंढरी माजं म्हायार[१] साजनी
विठ्ठल शिवी चोळी हरीनामाची गजनी

पंढरी पंढरी माजं म्हायार देशामंदी
कुंडलीक बंदु चंद्रभागाच्या तासामंदी[२]

पंढरीला जाया माजी कालची तयारी
विठ्ठल मुराळी घोडं चरतं नयारी[३]

पंढरीची वाट मला दिसती चांगली
हळदकुंकवानी माजी पावलं सजली

पंढरपुरामंदी पाणी लागलं वडायीला
रुक्मीन बाई बोलं माजा कुंडलीक बुडयीला

हावशा माजा बंधु भेनी तीरथा[1] नेल्या होत्या

पंढरपूर वाई माजं म्हायार आनंदाचं
चंद्रभागाच्या तासामंदी वाई ते देऊळ नारंदाचं

पंढरीला जाते एवडी मोकळी माजी वेनी
साधूच्या बराबरी मी ग आकाडच्या[2] केल्या दोनी

पंढरीला जाया एवडं मोकळं माजं केस
देवा माज्या विठ्ठलाला माज्या साधूला एकादस[3]

पंढरपुरीच्या ग माळीणी ठेंगण्या
फुलांच्या कंगण्या रुक्मिनीला

पंढरपुरीच्या ग माळीणी उंच काठ्या
फुलांच्या चिंचपेट्या रुक्मिनीला

पंढरपुरामंदी दिवाळसणाचा आनंद
जनी ववाळी विठ्ठलाला रखुमाईची नणंद

पंढरीला जाया आडवी लागली जेजुरी
विठ्ठलाच्या आदी देव भेटला मल्हारी

जाते हरीच्या दर्शनाला झाले उभ्यारी घाम्यारी[4]
घीन हरीचं दरशन मग फिरीन माघारी

पंढरीची ग वाट सये कशानं सादळली[5]
कावड ग बाई एकनाथाची हिंदळली[6]

पंढरपुरामंदी उभी राहिले चिऱ्यावरी
नजर माझी गेली विठूदेवाच्या तुऱ्यावरी

पंढरपुरामंदी बाई पैशाला माळा नऊ
देवा माझ्या विठ्ठला हात पुरेना खाली लवू

पंढरपुरामंदी बाई पैशाला माळा ईस[7]
देवा माझ्या विठ्ठला हात पुरेना खाली बैस

पंढरी पंढरी सारी पंढरी हिरवीगार
विठू सख्याचा माज्या तुळशीबनाला आला भार

पंढरीमंदी उंच दुकान आत्ताराचं
हळदकुंकवाचं राज अखंड भरताराचं[8]

---

१. तीर्थ, पवित्र ठिकाण. २. आषाढी एकादशी. ३. एकादशी. ४. घाबरणे, घा
६. उसळली, हेंदकळली. ७. वीस. ८. पतिदेवाचं.

पंढरीला जाया जाता म्हणूनी व्हाऊ नको
देवा माज्या विठ्ठलाला वाट बघाया लावू नका

पंढरीला जाया घाट चढते दरडीचा
सावळ्या विठोबाचा आला सांगावा पिरतीचा

पंढरीला जाया बाई संगं घेते मी वहिनीला
सोन्याच्या कळशीनं पाणी घालीन सजनीला

पंढरीला ग जाते संगं नेते मावशीला
विठ्ठलदेव सये पाणी घालीतो तुळशीला

चंद्रभागेची ग वाळू हिऱ्यामाणकांचे खडे
पंढरीत साधू सये नित नाचतो देवापुढे

पंढरपुरामंदी कोन करीतो हरी हरी
सावळा माजा पंढीयीत जागा झालाय वारकरी

पंढरपुरामंदी कोन हरवाळ[1] गीत गातो
विठ्ठल देवाचा ग ऊस कवळा पाणी पीतो

पंढरपुरामंदी गल्लोगल्लीनं लाल माती
रुक्मीन सारवीती रंगम्हालाच्या आडभिंती

पंढरपुरामंदी तुळशी आल्यात्या हुरडयाला
सावळा पांडुरंग वीणा वाजवी भोरडयाला

पंढरीचं कुंकू बाई मी एकटी कशी लेवू
संगं धाकटी जाऊ तिच्या खोलीला कशी जाऊ
सांगते मैना तुला तिच्या पलंगी किष्ण देवू

पंढरीची वाट सये चालाया हालकी गेली
ग्यानूबा तुकाराम तिथं साधूंनी कथा केली

पंढरीला जाते चला सयांनू कुनी कुनी
पांडुरंगाच्या कीर्तनाची तिथं आसावली[2] गोनी

पंढरपुरामंदी सारी[3] पदकं पिवळी
ज्ञानोबा तुकाराम सीन साधूंची कवळी

जाते पंढरीला मी का बसते बारीला
माज्या दर्शनाची चिंता पडली हरीला

---

[1] हळुवार. [2] आसुसली, आशा केली. [3] वयोमर्यादा.

संग्राहिका : **सौ. कुमुदिनी पवार**

पंढरपुरामंदी काळा मारुती वाटईला[१]
सावळा पांडुरंग देव मधल्या पेठईला[२]

पंढरपुरामंदी जावं आकाडी वारीला[३]
पांडुरंगाचं दर्शन घ्यावं पहिल्या बारीला

पंढरीला जाया औंदा[४] न्हवतं माजं मन
सावळ्या विठ्ठलानं चिठ्ठ्या[५] पाठवील्या दोन

पंढरीला जाया आल्या आळीच्या[६] बायका
सांगावं वर्तमान माजं विठ्ठल नायका

पंढरपुरामंदी गरुड खांबाला पडती मिठी
सावळ्या विठ्ठलाची साधु घेत्यात गाठीभेटी

दुरून दिसती पंढरीचं वाडंहुडं[७]
पांडुरंगाच्या राऊळात हायती चांदीचं तोळखडं[८]

दुरून दिसती पंढरीचे ते बुरूज
पांडुरंगाच्या राऊळात चांदीचं दरवाजं

पंढरीच्या तीरावरी पांडुरंग नवरा झाला
मोत्याची मंडवळी[९] सावळ्या राजसाला

पंढरी करूनी चला आळंदी एकबार
मानवी अवतार न्हाई येत वारंवार

३

संग्राहिका : **श्रीमती जानकीबाई पाटील**

जाईन पंढरीला उभी राहीली दीपमाळ
विठ्ठल देव बोले आता ये ग लेकीबाळं

पंढरीच्या वाटं दिंड्या पताका लोळती
देवा त्या विठ्ठलाचं साधु रिंगान खेळती

पंढरपुरामंदी नाही कशाची निवड
देवा विठ्ठलाला चोख्यामेळ्याची आवड

---

१. वाटेवर, रस्त्यावर. २. पेठेत, प्रमुख रस्त्यावर. ३. आषाढी एकादशीला. ४. यंदा
पत्र. ६. शेजारणी. ७. इमारती. ८. तळखडा. ९. बाशिंग, मुंडावळ्या.

पंढरीची वाट    काशीग झाली लाल
ध्यानोबा नामदेव    साधु इथे आले काल

पंढरीला जाती    लोक पैशाच्या बळं
माजा नमस्कार    काकड आरतीच्या येळ

पंढरीची वाट    चालाया ग हालकी
तुकाराम ध्यानूबाची    संगं साधूंची पालखी

पंढरपुरामंदी    पाऊस पडतो झिरीमिरी
ताईता बंधुराज    माजा भिजला वारकरी

पंढरपुरामंदी    माजं म्हायार साजनी
विठ्ठल शिवी चोळी    हरीनामाची गजनी

## ४

### संग्राहिका : **सौ. शर्रादनी मोहिते**

पंढरीला जाते    मला कशाला व्हावं कुनी
सांगते भैना तुला    म्होरं विठ्ठल मागं जनी

पंढरीच्या वाटं    सांडीला चुना कात
विठ्ठल रुकमीन    दोघं गेल्याती पानं खात

पंढरीच्या वाटं    वाट लागली चिखलाची
सांगते शेजीबाई    मला सोबत विठ्ठलाची

पंढरीची वाट    वाटं सोन्याचं सरायाट[1]
ध्यानूबा तुकाराम    साधु निघाले मरायाठ

पंढरपुरामंदी    गल्लोगल्लीनी कासायार
रुकमीन चुडे लेली    वर बुक्क्याचं दुसायार[2]

पंढबीरीला जाते    सर्व साईत[3] माझं झालं
हावशा माज्या बंद्दू    साधु माज्या तू संगं चल

पंढबीरीचा बुक्का    बुक्का लागला माझ्या चोळी
सया नारीला किती सांगू    गेले होते मी साधु आळी

पंढरीची वाट    कोणा पाप्यानं नांगरली
देवा विठ्ठलाची    गाडी बुक्क्याची हादरली

पंढरपुरामंदी कोन    खडीच्या चोळीची
रुकमीन माजी माता    दांगटाच्या आळीची

---

१. सराटे, काटे.    २. साहित्य.    ३. साहित्य.

पंढरीच्या वाटं आडवी लागती टाकळी
देवा माज्या विठ्ठलाच्या टाळ विन्याला साखळी

पंढरीच्या वाटं आडवी लागती संगवाडी
देवा माज्या विठ्ठलाची फुलाची येती गाडी

पंढरीच्या वाटं आडवी लागती खरडी
देवा माज्या विठ्ठलाची ह्‌ोती फुलाची दुरडी

पंढरपुरामंदी सारा यिन्याला यिना दाटं
देवा माज्या विठ्ठलाला साधुसंत भेटं

पंढरपुरी वाळवंटी एका शिनेचं[1] टाळकरी
विठ्ठल माजा देव मंदी यिन्याचा[2] माळकरी

पंढरपुरामंदी वाडा विठूचा चौकोनी
तुळशीवृंदावनी साधू नाचती मोरावानी

पंढरपुरामंदी पतिवर्ता नारी कोन
होळकरी वाड्यामंदी बायजाबाईचं वृंदावन

सोन्याची पंढयीरी ती का मातीनं झाकयीली
देवा माझ्या त्या विठ्ठलाची साक्ष कळसी राखयीली

पंढरपूर शहरी गल्लोगल्लीला गाईमुक
बोलं प्रीतीचा पांडुरंग पाणी पित्याती जनलोक

पंढरपुरामंदी डेरं दिल्याती खुतनीचं
जनलोक बोलती साधू आल्याती पैठणीचं

पंढरपुरामंदी सारी पताका जरीयाची
देवबी ध्यानूबाची दिंडी आळंदी करायाची

पंढरपुरामंदी बारी लागली कोकन्याची
सावळी सुरईत हाई विठ्ठल देखन्याची

पंढरपुरामंदी तिथं ऱ्हायाला नाही जागा
सावळ्या विठ्ठलानं त्येनं लावल्या तुळशीबागा

तान बी लागईली मला पंढरी शिवारात
प्रीतीचा पांडुरंग हाती तांब्या ह्यो भिवरत

पंढरीला जाया आडवा लागला कळस
खांद्यावरी वीणा हाई डोक्यावरी तुळस

पंढरपुरामंदी घरोघरी पोळ्या होती
देवा विठ्ठलाच्या लेकी सासऱ्याला जाती

---

१. जोडीचे, बरोबरीचे. २. विण्याचा, विणा घेतलेला.

संग्राहिका : सौ. गंगूबाई बाबर

पंढरीचं ग कुंकू　　म्हईन्याला लागं शेर
　　　　　　　　　जावा नंदांचं माझं घर

पंढबीरीला जाया　　मी का इच्यारी सासूबाई
　　　　　　　　　पांडुरंगाच्या वारीपायी

पंढरी पंढरी　　कशी दिसती अवचित
　　　　　　　देव बसले नामा नीट

पंढरीचा बुक्का　　लागीयेला पदराला
　　　　　　　　आले भेटूनी विठू त्या गुजराला

पंढरपुरामंदी　　बाई कशाचा गलबला
　　　　　　　गस्त घालीत कोन आला

पंढरीला जाते　　गरुडखांबाला देते तक्या
सावळ्या पांडुरंगा　　गुज सांगते तुला सख्या

गेली मी पंढरीला　　महाद्वारी बाई चुकली
देवा इट्टलाच्या　　चंद्रहाराला मी दिपली

पंढरपुरामंदी　　बाई माळीदादा गंभीर
रुकमिनीच्या राऊळाला　　घाली फुलाचं कांबीर[1]

पंढरपुरीचा बाई　　माळीदादा अव्वल
रुकमिनीच्या राऊळाला　　घाली फुलांची कवलं

जाईन पंढरीला　　उभी राहीन धोंड्यावरी
माजी नदार खिळली　　रुकमिनीच्या गोंड्यावरी

पंढरी पंढरी　　इठूरायाची नगरी
रुकमिनीबाईनं　　भरल्या बुक्याच्या घागरी

इसाव्यापासूनी　　बाई पंढरी तीन कोस
देवा माज्या इट्टलाचा　　दिसे सोन्याचा कळस

पंढरपुरामंदी　　याक नवाल देकीयलं
इट्टल देवायानी　　वाघ रथाला जुपीयलं

पंढरीचा माळ　　दिसे हिरवा लुसलुशी
देवा इट्टलानं　　दारी लावल्या तुळशी

पंढरपुरामंदी　　देवाची कुंची आळी
इट्टलदेव बोलं　　दारी बुक्यांची रांगूळी

पंढरपुरामंदी　　काय वाजत गाजत
सोन्याचं बाशिंग　　लगीन देवाचं लागतं

---

१. पखरण, आच्छादन.

संग्राहिका : **सौ. यशोदा पाटील**

पंढरीचा विठू येतो माझ्या गावाकडं
सावळा पांडुरंग लावून गेला मला वेड

पंढरपुरामधी कशाची हूल झाली
देव माझ्या विठ्ठलानं जाई तुऱ्यासाठी नेली

पंढरपुरामधी रुकमाबाई माझी सखू
कोऱ्या नी कागदात तिनं धाडिलं मला कुंकू

काय पंढरी जाते देवा वाट लागली खडकाची
वाट लागली खडकाची बोटं नाजुक जोडव्याची

पंढरपुरामधी दोघी माळणी जावा जावा
देवा विठ्ठलाच्या पागोट्याला तुरा लावा

पंढरपुरामधी एक नवल विकती
हरीच्या रथाला घोडे सोन्याचे जुंपती

## ७

संग्राहक : **श्री. वि. वा. जोशी**

पंढरी पंढरी नाही पाहिली अजून
आहे कोणत्या बाजूनं

पंढरी पंढरी नाही पाहिली अजून
तिथे विठोबाचे चाले भजन पूजन

पंढरी पंढरी सये इथून किती कोस
सांगते शेजीबाई बघ चालला दिस

दुरूनी दिसती पंढरी निशानाची
खूण दयाळा विठ्ठलाची

पंढरी पंढरी येथून किती लांब
तिथे सोनियाचे खांब

दुरून दिसते किती सुंदर पंढरी
दयाळा विठ्ठलाला आहे तिथे झागिरी[१]

---

१. जहागिरी, दौलत.

कोऱ्या कागदात तिनं पाठविली ल्हाई

पंढरपुरामधी विठ्ठल माझा सखा
धाडिला त्यानं मला अबीर बुक्का

पंढरपुरामधी विठ्ठलाला उपवास घडे
फराळाला पेढे मुखशुद्धी वेलदोडे

पंढरपुरामधी विठ्ठलाला उपवास
फराळाला सीताफळ मुखशुद्धी जायफळ

विटेवरी उभा युगं झाली किती
उदार तुझा पती रखमाबाई

माझं नव्हे कोणी देवा सोयरीचे
चिरे तुझ्या पायरीचे पांडुरंगा

## ८

### संग्राहिका : **सौ. नलिनीबाई शिंदे**

पंढरीला जावं औंदा नव्हतं माझे मनी
रथात बसुनी आले रुखमिनीचे धनी

पंढरीला जावं औंदा नव्हतं माझे चित्ती
रथात बसुनी आले रुखमिनीचे पती

पंढरीला जाया नाही केलं पीठपाणी
पंढरीचा विठू संगं खजिन्याचा वाणी

पंढरी पंढरी मला दिसते सोन्याची
कवलारी पेठ देवा विठ्ठल वाण्याची

पंढरी पंढरी मला दिसे हिरवीगार
देवा विठ्ठलाच्या आला गजनीला भार[१]

पंढरी पंढरी मला दिसती लाल लाल
देवा विठ्ठलानं तिथं पेरिली मखमल

पंढरीचं श्यात देव विठ्ठल नांगरी
राही[२] रखमीन लावी भोपळी डोंगरी

---

...हर. २. राधिका.

संग्राहिका : **सौ. हिराबाई यादव**

दुरुनी दिसती पंढरी पिवळी
सोन्याचं वृंदावन आत तुळस कवळी

पंढरीची वाट खडक मुरुमाची
रुखुमाईची बोटं शिणली जोडव्याची

पंढरीशी जाता दुपार उलटली
विठ्ठलपूजेची जाई ओटयात फुलली

पहाटेच्या प्रहरी कर्णा वाजतो काचेचा
रथ हळू चाले महालक्ष्मी मातेचा

विठ्ठल रखुमाई बोलती गुजगोष्टी
जनाबाई साजणी आनंदानं वाडा लोटी

पंढरीला जाया मन माझं धावं
विठ्ठल देवानं पाठविला नामदेव

पोथी पुस्तकाचा कळेना अनुभव
सावळ्या विठ्ठला मला पंढरी दाव

रखुमाई धुणं धुती साडी चोळी चंद्रकळा
दोघांच्या पिरतीनं विठ्ठल घाली पिळा

सया पुसत्यात्या विठ्ठल ग कसला
जवसाच्या फुलावाणी सुरतीचा मासला

विठ्ठलाचं सुख रखुमाई सांगती कावेरीला
नवलाख सोनं कुंकू ल्यायाच्या आरशाला

विठ्ठलाचं सुख रखुमाई सांगती बापाला
नवलाख मोती सात ताळांच्या रथाला

माहेर ग माझे बाई पंढरी गाव
माझ्या पित्याचे नाव त्रैलोक्या ठावं

पंढबीरीला जाता माळ दिसतं भुंडं भुंडं
देवा ग विठ्ठलाच्या ह्याती दिसती गोफणगुंडं

विठूरायाच्या ह्याती गोफण सोनीयाची
पंढबीरीची श्यातं तुका राखीतो भोरड्याची

पंढरपुरामंदी गल्लोगल्लीला तुळशीबागा
देवा ग विठ्ठलाचा रथ जायाला नाही जागा

पंढबीरीला जाता आडवं लागलं तासगाव
खडीच्या चोळीवर देवा विठ्ठला तुझं नाव

पंढबीरीची वाट लागते कुसळाची
माझ्या त्या रखुमाईची बोटं नाजूक मासूळीची

पंढरपुरामंदी हैत्या कुंकवाच्या राशी
देव विठ्ठल घालयीतो आयेव नारीच्या पदराशी

वाकरी गावीच्या वड्यावर हत्ती आलाया घोळायाला
ग्यानूबा तुकाराम आले रिंगाण खेळायाला

वाकरी गावीच्या वड्यावरी हत्ती आलाया मेटाकुटी
ग्यानूबा तुकाराम साधू शेल्यानं खडं लूटी[१]

नऊ लाख मोती टाळांची टोपणं
ग्यानूबा तुकाराम साधू दिसती देखणं

पंढरपुरामंदी गल्लोगल्लीनं कासार
रुकमीण चुडं लिती उडं बुक्क्याचा धुसार[२]

---

१. लोटतो, झाडून काढतो, दूर करतो. २. धूळ.

संग्राहिका : **श्रीमती गिरिजाबाई केळकर**

पंढरीशी जाता भेटीला काय नेऊ
अंजिरी चोळी शिवू रखमाईला

पंढरपुरामधी दोन्ही बाजूंनी सोनार
घडविला चंद्रहार रखमाईला

विठ्ठल विठ्ठल हाका मारितें केव्हाची
चंद्रभागे आलं पाणी झड सुटली हिवाची

विटेवरी उभा युगे झाली अठ्ठावीस
देवा दयाळाला कुणी म्हणेना खाली बस

# पालखी

### संग्राहिका : डॉ. सरोजिनी बाबर

संत म्हनती संताला, तुमच्या गावाचं नाव काय
आमच्या गावाचं नाव अलंकापुरी, पालखी महाद्वारी
सोन्याचा पिंपळ देवाचिया द्वारी
समांध घेतली नंदीखाली ज्ञानोबांनी
आळंदीचे लोक जमून पालखी आनली चिखली मोशीवरी
पुन्याचं ख्याडपाड, आडवं गेलं गावकरी
पालख्या भवानी पेठंवरी
संताला मेजवानी गूळपोळी, शिरापुरी
तोंडी लावाया शाक तरकारी
गनेशटेबल[१] शिपायांची गर्दी भारी
जरीचं निशान फाड फाड करी
चांदीसोन्याचा साज निवरती म्हाराजांच्या घोड्यावरी
पताका चालल्यात हारोहारी
टाळ मुरदुंगाची महिमा भारी
अबीर बुक्क्याची गर्दी सारी
नगार नौबद गाड्यावरी
ऐका ऐका शिंगाची ललकारी
दोनी पालख्यांचा संगम झाला छत्रीवरी
ममंदवाडीवरी आरती करी
फराळ कराया, गेलं उरळीवरी
घाट येंगून[२] गेलं करंवरी[३]
पाऊस पडं झिरमिरी
आकाडीची महिमा भारी

खांद्याव पताक भिजल्यात वारकरी
राहुटया दिल्या हारोहारी
पैली आंगूळ भागीरथीवरी
संताला मेजवानी गूळपोळी शिरापुरी
तोंडी लावाय शाक तरकारी
तिनी पालख्या संगम झाला नीरावरी
नीरा नदीचं ताज भारी
साडेतीनशे यात्रा जमली वाखरीवरी
वाखरीचं रंजान भारी
निवरती म्हाराजांचा घोडा नाचतो नानापरी
सर्वी यात्रा गेली पुलावरी
संत म्हनती संताला तुमच्या गावाचं नाव काय?
आमच्या गावाचं नाव पंढरपूर
पंढरपुरात झाली लोटालोटी
तुळशीबनात झाली यात्रांला दाटी
देवा आंदी कुंडलिकाच्या घेऊ भेटी
गोपाळपुरी गोपाळकाला
देव कैकांच्या भक्तीला गेला
असं पंढरी तीर्थ भारी
गोरा कुंभार सोनार नरहरी
सावता माळी नामदेव हरी
उद्धरूनी गेले महाद्वारी
काय यात्रा भरली भारी
उभा चोखूबा महाद्वारी
नामदेव बसल्यात पायरीवरी
कापूर जाळत्यात हारोहारी
यात्रांनी भरल्या नावा
करा इट्टल रुकमिनीचा धावा
संत म्हनती संताला
आसं आपुन तीरीथ करू वारुंवार
देवासंगं जेवतो चोखा महार
सावता माळी घाली फुलांचा हार